# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन आदेश क्रमांकः कअनि ११२३/प्र.क्र.५०/१४ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २८ जून, २०२३

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) अनुसार खाली नमूद केलेल्या मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या आंतरविभागीय बदल्या करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | श्री / श्रीमती | कक्ष अधिकारी यांचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) | श्री. | अनिरुध्द शंकर गोसावी | कृषि व पदुम विभाग | **नगर विकास विभाग** |

**२. उपरोक्त नमूद श्री.गोसावी यांना दिनांक ३०.०६.२०२३ (म.नं.) पासून रकाना क्र.४ येथील नमूद विभागातून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.**

३. सदर आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून कृषि व पदुम विभागाने नव्याने आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.

४. श्री.गोसावी हे दिनांक ३०.०६.२०२३ (म.नं.) रोजी नगर विकास विभागात रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुध्द शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/प.क्र.१८६/१६/कार्यासन-१४, दिनांक २३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

**५. श्री.गोसावी यांनी त्यांची बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणल्यास संबंधितांची कृती गैरवर्तणूक समजण्यात येईल.**

६. **आहरण व सवितरण अधिकारी तसेच अधिदान व लेखाधिकारी यांना कळविण्यात येते की, श्री.गोसावी यांचे १ जुलै, २०२३ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत पूर्वीच्या विभागातून अदा करण्यात येऊ नये अन्यथा त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.**

७. मंत्रालयीन विभागातील सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार बदलीनंतरच्या प्रशिक्षणाची कार्यवाही करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्र.कअनि-१११६/प्र.क्र.३२/१४-ब, दिनांक २३.०५.२०१६ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार विभागात बदलीने रुजू झालेल्या कर्मचाऱ्यांना बदलीनंतरचे प्रशिक्षण संबंधित मंत्रालयीन विभागांनी आयोजित करावे.

८. श्री.गोसावी विभागात रुजू झाल्याबाबतची माहिती नगर विकास विभागाने सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १४-ब) यांना सादर करावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२८१९२९०६९१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VINAYAK
BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.06.28 19:30:57 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित कक्ष अधिकारी ( संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग/नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सह/उप सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग/नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, ठाकरसी हाऊस, बॅलार्ड पिअर, सुरजी वल्लभदास रोड, मुंबई-४००००१.
५) आहरण व सवितरण अधिकारी, कृषि व पदुम विभाग/नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत),
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७) निवड नस्ती- साप्रवि १४-ब.